**प्राथमिक शिक्षण संचालनाकडील ई-गव्हर्नस अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी घेण्यात आलेल्या सेवांसाठी खर्च करण्यात आलेली रक्कम उपलब्ध करुन घेण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ई-गव्ह-०३२३/प्र.क्र.७/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशिका/२०२३/ई-गव्ह./खर्च रक्कम/१४३/०१९७६, दि. २७ मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

प्राथमिक शिक्षण संचालनालयाकडील ई-गव्हर्नन्स अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी SMS, google map, Mahaonline इत्यादी सेवा तातडीची निकडकरिता घेण्यात आल्या आहेत. तसेच सदर सेवांसाठीचा खर्च प्रधानमंत्री पोषणशक्ती निर्माण योजनेच्या व्यवस्थापन सनियंत्रण व मूल्यमापन निधीमधून (MME) केला आहे. सदर सेवा एप्रिल, २०१७ ते मे, २०१९ या कालावधीत घेण्यात आल्या आहेत. त्याअनुषागाने आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये देय असलेली रक्कम वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने शिक्षण संचालक, प्राथमिक यांना तातडीची निकडकरिता येणाऱ्या खर्चाची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ई-गव्हर्नन्स अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी SMS, google map, Mahaonline इत्यादी सेवा तातडीची निकडकरिता घेण्याकरिता येणाऱ्या खर्चास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच त्यासाठी येणाऱ्या रु.४,८७,३६३/- (चार लाख सत्याऐंशी हजार तीनशे त्र्येसष्ट ) एवढ्या खर्चास व सदर रक्कम शिक्षण संचालक (प्राथमिक)यांना अदा करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२२-२३ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. सहायक संचालक (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर निधी कोषागारातून आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. क्र.४३२/व्यय-५, दिनांक ३१.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११०००५१३९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2023.04.06 12:40:39 +05'30'

**(विवेक सपकाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :-

१) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) प्रधन सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र, पुणे.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.